**जनाई शिरसाई उपसा सिंचन योजना ता.दौंड, बारामती व पुरंदर जि.पुणे योजनेच्या कालव्यांना बंदिस्त नलिका वितरण प्रणालीमध्ये रूपांतरण करणेच्या कामासाठी विस्तार व सुधारणा अंतर्गत प्रशासकीय मान्यता मिळणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**जलसंपदा विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक : प्रमाप्र-२०२४/(प्र.क्र.५२४/२०२४)/सिंव्य(कामे)**
मंत्रालय, मुंबई-४०००३२
दिनांक: २५ फेब्रुवारी ,२०२५

**वाचा:-**

१. कार्यकारी संचालक,महाराष्ट्र कृष्णा खोरे विकास महामंडळ, पुणे यांचे पत्र. जा.क्र. मकृखोविम १६/(५३१/२०२३)/सिंव्य ३/६१९८/सन २०२३, दिनांक १०/१०/२०२४.
२. शासन निर्णय, क्र.-२०१७/५६६/१७/सिंव्य(कामे), दि.३१/०८/२०१८.
३. शासन निर्णय, क्र.-२०१८/५५१/१७/सिंव्य(कामे), दि.२७/११/२०१८.
४. शासन निर्णय, क्र.-२०१३/७८५/१३/सिंव्य(कामे), दि१/८/२०१९.
५. शासन परिपत्रक क्र.-प्रमा२०१३/७८५/१३/सिंव्य(कामे),दि.१६/९/२०२१.
६. शासन परिपत्रक क्र.प्रमा-२०१३/(७८५/१३/(सिंव्य(कामे),दि१/१/२०१५.
७. शासन निर्णय,क्रमांक संकिर्ण-२०२२/प्र.क्र.५१६/२०२२/सिंव्य(कामे) दिनांक १४/०३/२०२३.

**प्रस्तावना:-**

जनाई उपसा सिंचन योजना या प्रकल्पांतर्गत नवीन मुठा उजव्या कालव्याद्वारे कि.मी. ९४ मधून वरवंड या तलावात पाणी सोडून तेथून उपसा करुन जनाई ही उपसा सिंचन योजना प्रस्तावीत आहेत. या प्रकल्पामुळे योजनेद्वारे पुणे जिल्हयातील दौंड, बारामती व पुरंदर तालुक्यातील अवर्षणग्रस्त भागातील ८३५० हे. क्षेत्रास सिंचनाचा लाभ होणार आहे. जनाई उपसा सिंचन योजनेच्या लाभक्षेत्रातील १८ तलाव पावसाळयात वाहून जाणा-या अतिरिक्त पाण्याने भरुन देण्याचे सु.प्र.मा मध्ये मंजूर आहे. मंजूर असलेले १८ पैकी १३ तलाव भरून देण्यात येतात. उर्वरित ५ तलाव तांत्रिक अडचणी मुळे भरले जात नाही. तृतीय सुधारीत प्रशासकीय अहवालानुसार जनाई उपसा सिंचन योजने करिता २.१७ अ.घ.फू. पाणी वापर मंजूर आहे. योजनेतील पंप गृह, उध्दरण नलिका व वितरण कुंड सर्व शिर्ष कामे पूर्ण झाली आहेत. योजनेतील सर्व मुख्य कालवे, वितरण व्यवस्था यांचे सर्व माती काम व बांधकाम झालेले आहे.

शिरसाई उपसा सिंचन योजना या प्रकल्पांतर्गत नवीन मुठा उजव्या कालव्याद्वारे कि.मी. १३८ मधून शिर्सुफळ या तलावात पाणी सोडून तेथून उपसा करुन शिरसाई ही उपसा सिंचन योजना प्रस्तावीत आहेत. या प्रकल्पामुळे योजनेद्वारे पुणे जिल्हयातील बारामती व पुरंदर तालुक्यातील अवर्षणग्रस्त भागातील ५७३० हे. क्षेत्रास सिंचनाचा लाभ होणार आहे.शिरसाई उपसा सिंचन

योजनेच्या लाभक्षेत्रातील ४७ तलाव पावसाळयात वाहून जाणा-या अतिरिक्त पाण्याने भरुन देण्याचे सु.प्र.मा मध्ये मंजूर आहे. मंजूर असलेले ४७ पैकी ३२ तलाव भरून देण्यात येतात. उर्वरित १५ तलाव तांत्रिक अडचणी मुळे भरले जात नाही. तृतीय सुधारीत प्रशासकीय अहवालानुसार शिरसाई उपसा सिंचन योजने करिता १.४३ अ.घ.फू. पाणी वापर मंजूर आहे. योजनेतील पंप गृह, उध्दरण नलिका व वितरण कुंड सर्व शिर्ष कामे पूर्ण झाली आहेत. योजनेतील सर्व मुख्य कालवे, वितरण व्यवस्था यांचे सर्व माती काम व बांधकाम झालेले आहे.

पुणे शहराचा पाणी वापर दिवसेंदिवस वाढत असून भविष्यात वाढणाऱ्या लोकसंख्येमुळे जनाई शिरसाई उपसा सिंचन योजनेस नियोजित ३.६ TMC पाणी मिळणे अशक्य आहे. त्यामुळे भविष्यात प्रत्यक्ष निर्मित सिंचन क्षेत्रापेक्षा कमी क्षेत्रास पाणी उपलब्ध होऊन सिंचन क्षेत्र कमी होणार आहे. जनाई शिरसाई उपसा सिंचन योजना अवर्षण ग्रस्त क्षेत्रामध्ये कार्यरत आहे. सदरील योजनेच्या कार्यक्षेत्रामध्ये पावसाचे प्रमाण खूप कमी आहे. तसेच डोंगराळ भागातील मुरमाड जमीन असल्याने झिरपण्यामुळे पाणी गळती मोठया प्रमाणात होते. तसेच या भागात उच्च बाष्पीभवन दरामुळे पाण्याचा तोटा जास्त प्रमाणात होतो. योजनेतील सर्व कालवे हे उघड्या पध्दतीचे असल्याने गळतीचे प्रमाण जास्त आहे. योजनेतील सदर कालव्यांची कामे जवळपास २५ वर्षापेक्षा जास्त जुने असून कमी पाणी उपलब्धतेमुळे बऱ्याच कालव्यांमध्ये अदयाप पर्यंत पाणी पोहोचलेच नाही. त्यामुळे कालवा प्रणाली क्षतिग्रस्त होत असून दिवसेंदिवस जास्त नुकसान होत आहे.

नलिका प्रणालीमूळे भूसंपादनाची गरज राहत नाही. तसेच मशागतीस कोणताही अडथळा येत नाही. नलिका वितरणाद्वारे समन्यायी पाण्याचे वाटप करणे सूलभ होते. नलिका वितरण प्रणालीचा देखभाल दुरूस्ती व परिचलनाचा खर्चही तुलनेने कमी राहतो. डोंगर उतारावरील , खोल खोदाईतील व काळया मातीतील कालव्यांवर तुलनेने देखभाल -दुरूस्तीचा खर्च जास्त राहतो. खडकवासला प्रकल्पातून सदर योजनेस पाणी मिळते तरी सदर योजना बंदिस्त नलिकेमध्ये रूपांतरीत केल्यास पाण्याचा कार्यक्षम वापर होईल व पाण्याची बचत होऊन पुणे महानगरपालिकेस पाणी पुरवठयामुळे खडकवासला प्रकल्पावरील येणारा ताण कमी होईल. योजना बंदिस्त नलिकेमध्ये रूपांतरीत केल्यास पाण्याचा नाश (Losses) कमी होतील व योजने अंतर्गत जे तलाव भरून देणे शक्य आहेत त्यासाठी आवश्यक शीर्ष उपलब्ध होऊन तलाव भरणे शक्य होईल.

या पार्श्वभूमीवर जनाई शिरसाई उपसा सिंचन योजनेच्या कालव्यांना बंदिस्त नलिका वितरण प्रणालिमध्ये रूपांतरण करण्याच्या विस्तार व सुधारणा प्रस्तावास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती त्याअनुषंगाने शासन पुढीलप्रमाणे निर्णय घेत आहे.

**शासन निर्णय :-**

महाराष्ट्र कृष्णा खोरे विकास महामंडळ, पुणे अंतर्गत जनाई शिरसाई उपसा सिंचन योजनेच्या कालव्यांना बंदिस्त नलिका वितरण प्रणालीमध्ये रूपांतरण करण्याच्या कामाच्या

रू. **४३८,४७,८७,४८३/- (**रू. चारशे अडतीस कोटी सत्तेचाळीस लक्ष सत्याऐंशी हजार चारशे त्र्याऐंशी फक्त**)** एवढया खर्चाच्या प्रस्तावास विस्तार व सुधारणा अंतर्गत खालील अटींच्या अधीन राहून सोबतच्या प्रपत्रानुसार प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे**.**

१) तांत्रिक मान्यता,निविदा प्रक्रिया,कामाचे नियोजन व पूर्णत्व , प्रशासकीय मान्यतेच्या मर्यादेत खर्च करणे इ. बाबींसाठी प्रचलित शासन निर्णय / परिपत्रके यांचे पालन करणे बंधनकारक राहिल.

२) प्रस्तावित कामांमुळे होणाऱ्या खोदकाम तोडफोड याव्दारे उपलब्ध होणारे बांधकाम साहित्याचा पूर्ण वापर करुन बचत साधावी.

३) सदर अंदाजपत्रकातील कामांसाठी कोणत्याही प्रयोजनार्थ सर्वसाधारणपणे मंजूर प्रशासकीय मान्यतेच्या मर्यादेबाहेर जाऊन, निधी वितरण अथवा अतिरिक्त खर्च करता येणार नाही.

४) सदर काम सुरु करण्यापूर्वी प्रकल्पाच्या लाभक्षेत्रांतर्गत यापूर्वी स्थापित पाणीवापर संस्था अद्याप हस्तांतरण न झालेल्या उवर्रित एकूण ०९ पाणीवापर संस्थांना लाभक्षेत्र हस्तांतरीत करण्याची संपूर्ण जबाबदारी क्षेत्रिय अधिकाऱ्यांची राहील.

५) प्रशासकीय मान्यता म्हणजे अहवालातील तांत्रिक बाबी अथवा निविदा विषयक क्षेत्रीय स्तरावरील निर्णयास मान्यता गृहीत धरली जाणार नाही. प्रकल्पासाठी कोणत्याही प्रयोजनार्थ मंजूर प्रशासकीय मान्यतेच्या मर्यादेबाहेर जाऊन निधी विरण अथवा अतिरिक्त खर्च न करण्याची जबाबदारी संपूर्णपणे कार्यकारी संचालक, महाराष्ट्र कृष्णा खोरे विकास महामंडळ, पुणे यांची राहील.

६) प्रत्यक्ष सिंचन व पाणीपट्टी वाढविण्याबाबत क्षेत्रिय अधिका-यांनी विशेष प्रयत्न करावेत.

७) प्रत्यक्ष काम सुरू करण्यापूर्वी खाजगी सल्लागारामार्फत तयार करण्यात आलेले बंदिस्त नलिका वितरण प्रणालीची संकल्पने मध्यवर्ती संकल्पचित्र संघटना, नाशिक मार्फत स्वतंत्रपणे मूल्यार्पित करून घेण्याची व त्यानुसार तांत्रिक मान्यता प्रदान करण्याची जबाबदारी मुख्य अभियंता, (ज.सं.) जलसंपदा विभाग, पुणे यांची राहील .

८) प्रस्तावित बंदिस्त नलिका वितरण प्रणालीच्या संरेखेस सक्षम स्तरावर मान्यता घेण्यात यावी. तसेच सदर मान्यता काही अटींच्या अधिन राहून दिली असल्यास त्या अटींची पूर्तता प्रत्यक्ष काम हाती घेण्यापूर्वी झाली आहे याची खातरजमा मुख्य अभियंता, (ज.सं.) जलसंपदा विभाग, पुणे यांनी करावी.

९) प्रत्यक्ष काम सुरू करण्यापूर्वी उघड्या पध्दतीचे पारंपारिक कालवे बंदिस्त नलिका वितरण प्रणालीमध्ये रूपांतरित केल्यामुळे कालव्याच्या वहन क्षमतेत वाढ होऊन अंदाजे १.०६ टि.एम.सी. पाणी बचत साध्य करण्याची जबाबदारी क्षेत्रिय अधिकाऱ्यांची राहील.

१०) राज्य तांत्रिक सल्लागार समिती यांनी उपस्थित केलेल्या सर्व मुद्यांचे अनुपालन करण्याची जबाबदारी कार्यकारी संचालक, महाराष्ट्र कृष्णा खोरे विकास महामंडळ , पुणे यांची राहील.

११) उध्दरण नलिकेस गंजविरोधी प्रक्रिया करणेबाबतची कार्यपध्दती व परिणामकारकता यांचा एकत्रित विचार करून त्याबाबतची तांत्रिक व्यवहार्यता तपासावी व त्यानुसार त्यांच्या आवश्यकतेबाबत मुख्य अभियंता स्तरावर निर्णय घ्यावा.

१२) प्रत्यक्ष काम सुरु करण्यापूर्वी जनाई शिरसाई या बांधकामाधीन प्रकल्पाचे लेखे बंद करण्याबाबतची सर्वस्वी जबाबदारी कार्यकारी संचालक, महाराष्ट्र कृष्णा खोरे विकास महामंडळ, पुणे यांची राहील.

१३) प्रकल्पास यापूर्वी मंजूर असलेल्या तृतीय सुप्रमा प्रस्तावातील कामांची दुरुक्ती या प्रस्तावामध्ये नसल्याबाबतची खात्री मुख्य अभियंता, (ज.सं.), जलसंपदा विभाग,पुणे यांनी करावी.

१४) जनाई व शिरसाई उपसा सिंचन योजनेचे दुरुस्ती काम पूर्ण झाल्यानंतर ८६४० हे सिंचन क्षेत्र पुनर्स्थापित करण्याची जबाबदारी मुख्य अभियंता, (ज.सं.)जलसंपदा विभाग, पुणे यांची राहील.

१५)महाराष्ट्र सिंचन सुधारणा कार्यक्रम (MIIP)अंतर्गत मंजूर कामामध्ये विषयांकित विस्तार व सुधारणा अंतर्गत समाविष्ट कामांची दुरुक्ती होणार नाही, याची क्षेत्रिय मुख्य अभियंता यांनी दक्षता घ्यावी.

प्रस्तावित कामासाठी होणारा खर्च ४७०० मोठे पाटबंधारे प्रकल्प यावरील भांडवली खर्च, ८०- सर्वसाधारण, १९०-सार्वजनिक क्षेत्रातील व इतर उपक्रमातील गुंतवणुका विशेष दुरूस्ती / विस्तार व सुधारणा कार्यक्रमा अंतर्गत भाग भांडवली अंशदान (०४)(०२) महाराष्ट्र कृष्णा खोरे विकास महामंडळ, भाग भांडवली अंशदान (उर्वरीत महाराष्ट्र) (कार्यक्रम) (४७०० ०२३८) (योजनांतर्गत) ५४ गुंतवणुका या लेखाशिर्षा खाली टाकुन मंजुर अनुदानातुन भागवावा.

या कामास प्रदान करण्यात आलेली प्रशासकीय मान्यता सिंव्य (कामे) कार्यासनाच्या नोंदवही मध्ये क्र. ३९ सन २०२४-२५ मध्ये नोंदविण्यात आलेली आहे.

नियोजन विभागाचा अनौपचारीक संदर्भ क्र. ०३/२०२५/कार्या-१४३४ दि १०/१/२०२५ ,वित्त विभागाचा अनौपचारीक संदर्भ क्र.०६/२०२५/ व्यय-१२ दि १४/१/२०२५ व राज्य मंत्रिमंडळाच्या दि. ११/०२/२०२५ रोजीच्या बैठकीतील मान्यतेनुसार हा शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय संकेतस्थळावरwww.maharashtra.gov.inउपलब्ध करण्यात आला असून त्यांचा संगणक संकेतांक २०२५०२२५१५४५४८०९२७ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

NAMITA GAURAV BASER

Digitally signed by NAMITA GAURAV BASER
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WATER RESOURCES DEPARTMENT,
2.5.4.20=8ee2809da7de03ff444cfa186d623a75fac5db94fb5c9de45f8a05b5f4b6fb7f, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=69D010EE03D01B7C859C5458FEEAF66B1EAE16BC67F5CCB127AE66608DE5FA48, cn=NAMITA GAURAV BASER
Date: 2025.02.25 15:47:11 +05'30'

**(न.गौ.बसेर)**
**शासनाच्या उप सचिव**

**सोबत:सहपत्र**
**प्रत:-**

१)मा.राज्यपाल यांचे सचिव,
२)मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,
३)मा.उपमुख्यमंत्री (नगरविकास/ वित्त व नियोजन) यांचे प्रधान सचिव,
४)मा.अध्यक्ष/उपाध्यक्ष,विधानसभा, विधानभवन,मुंबई
५)मा. सभापती/ उपसभापती,विधानपरिषद, विधानभवन,मुंबई
६)मा.विरोधीपक्षनेते,विधानसभा,मुंबई यांचे कार्यालय,विधानभवन,मुंबई
७)मा.विरोधीपक्षनेते,विधानपरिषद,मुंबई यांचे कार्यालय,विधानभवन,मुंबई
८)मा.मंत्री (जलसंपदा), गोदावरी व कृष्णा खोरे विकास महामंडळ यांचे स्वीय सहाय्यक ,
९)मा.मंत्री (जलसंपदा),तापी, विदर्भ व कोंकण खोरे विकास महामंडळ यांचे स्वीय सहाय्यक
१०)अपर मुख्य सचिव,(वित्त) ,वित्त विभाग,मंत्रालय,मुंबई,
११) अपर मुख्य सचिव, (नियोजन), नियोजन विभाग,मंत्रालय, मुंबई,
१२) अपर मुख्य सचिव, (जलसंपदा) जलसंपदा विभाग,मंत्रालय, मुंबई,
१३)सचिव (जसंव्य व लाक्षेवि),जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई,
१४)सचिव (प्रकल्प समन्वय), जलसंपदा विभाग, मंत्रालय,मुंबई,
१५)महालेखापाल-१(लेखा व अनुज्ञेयता/लेखापरीक्षा),महाराष्ट्रराज्य,मुंबई,
१६)महालेखापाल-२(लेखा व अनुज्ञेयता/लेखापरीक्षा),महाराष्ट्रराज्य,नागपूर,
१७)कार्यकारी संचालक,महाराष्ट्र कृष्णा खोरे विकास महामंडळ, पुणे
१८)मुख्य अभियंता (जसं),जलसंपदा विभाग, पुणे
१९) आंतर वित्त सल्लागार व सहसचिव,जलसंपदा विभाग, मंत्रालय,मुंबई,
२०)अधीक्षक अभियंता, पुणे पाटबंधारे प्रकल्प मंडळ, पुणे
२१)कार्यकारी अभियंता,चासकमान पाटबंधारे विभाग,पुणे
२२)सिं.व्य.(कामे)कार्यासन संग्रहार्थ.

**शासन निर्णय क्रमांक:प्रमाप्र-२०२४/(प्र.क्र.५२४/२०२४)/सिंव्य(कामे),**
**दि.  २५/२/२०२५ चे सहपत्र**

| **Sr. No.** | **Description of Item** | **Amount (Rs)** |
|---|---|---|
| **1** | **Works (Excluding Royalty)** | |
| | L-मातीकाम (बंदिस्त नलिका वितरण प्रणाली ) | |
| A | Janai Lift Irrigation Scheme | |
| | Janai Left Bank Canal- Stage-II | 411013000 |
| | Janai Right Bank Canal- Stage-II | 778653801 |
| | Purandar Branch Canal- Stage-III | 549430887 |
| | Kusegaon Branch Canal (Main Line & Minors)- Stage-I | 99936014 |
| | Padvi Branch Canal (Main Line & Minors)- Stage-II | 28986957 |
| | Hinganigada Branch Canal (Main Line & Minors)- Stage-II | 109051069 |
| A | Total Janai Lift Irrigation Scheme | 1977071728 |
| | | |
| B | Shirsai Lift Irrigation Scheme | |
| | Shirsai Left Bank Canal | 510588784 |
| | Shirsai Right Bank Canal | 414349053 |
| | Shirsuphal Left Bank Canal | 282713484 |
| | Shirsuphal Right Bank Canal | 138944146 |
| B | Total Shirsai Lift Irrigation Scheme | 1346595467 |
| 2 | Total Work Cost (A+B) | 3323667195 |
| 3 | Royalty | 57418351 |
| 4 | 1% Insurance | 33474344 |
| 5 | 18% GST Charges | 603473792 |
| 6 | 3% Contengencies | 100423038 |
| 7 | Operation & Maintanance (For 5 Years) | 77741763 |
| | Total Rs. = 2+3+4+5+6+7= | 4196198483 |
| 8 | Janai Pump House Repair | 30000000 |
| 9 | Anti Rust Treatment for Janai Rising Main | 30000000 |
| 10 | Shirsai Pump House Repair | 12500000 |
| 11 | Anti Rust Treatment for Shirsai Rising Main | 30000000 |
| 12 | Provison for land aquistion and Crop Compensation | 86089000 |
| 13 | **Grand Total in Rs.** | **4384787483** |

NAMITA GAURAV BASER

Digitally signed by NAMITA GAURAV BASER
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WATER RESOURCES DEPARTMENT,
2.5.4.20=8ee2809da7de03ff444cfa186d623a75fac5db94fb5c9de45f8a05b5f4b6fb7f, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=69D010EE03D01B7C859C5458FEEAF66B1EAE16BC67F5CCB127AE66608DE5FA48, cn=NAMITA GAURAV BASER
Date: 2025.02.25 15:47:34 +05'30'

(न.गौ.बसेर)

शासनाच्या उपसचिव